विधानमंडळ कामकाज प्राथम्य/ तात्काळ

विधानमंडळ अधिवेशनाशी संबंधित
कामकाज प्राथम्यक्रमाने हाताळण्याबाबत

# महाराष्ट्र शासन

**संसदीय कार्य विभाग,**

**शासन परिपत्रक क्रमांक : विमंअ-०२२०/(३)/प्र.क्र.८०/पाच**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.

**दिनांक :- १९ ऑगस्ट, २०२०**

पहा:- १) शासननिर्णय, सं.का.वि., क्र.एलईजी-१०९८/प्र.क्र.५१/९८/पांच, दि.२ डिसेंबर, १९९८.
२) शासनपत्र, सं.का.वि., क्रमांक-विमंअ-२००८/प्र.क्र.५७/पांच, दि.२ ऑगस्ट,२००८.
३) शासनपरिपत्रक, सं.का.वि., क्रमांक-विमंअ-०२२०/(२)/प्र.क्र.३७/पांच, दि.१२ फेबुवारी, २०२०
४) महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाचे परिपत्रक क्र.१०८९९/ ब दि.१० ऑगस्ट, २०२०
५) महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाचे परिपत्रक क्र.१११५० /ई-१, दि.१७ ऑगस्ट, २०२०

## परिपत्रक

महाराष्ट्र विधानमंडळाचे सन २०२० चे आगामी पावसाळी अधिवेशन, विधानभवन, मुंबई येथे सोमवार, दिनांक ७ सप्टेंबर, २०२० पासून सुरु होत आहे. अधिवेशनासंदर्भातील कामकाज प्राथम्यक्रमाने हाताळण्याबाबतच्या सूचना उक्त संदर्भाधिन अनुक्रमांक ३ येथील परिपत्रकान्वये, तसेच,यापूर्वी देखील सर्व विभागांना वेळोवेळी देण्यात आलेल्या आहेत. त्याअनुषंगाने, आता पुढील प्रमाणे सूचना देण्यात येत आहेत:-

१. तारांकित प्रश्न :-(१)**विधानमंडळ सचिवालयाने QIS ही संगणक प्रणाली विकसित केली असून संदर्भाधिन अनुक्रमांक ४ व ५ येथील त्यांच्या परिपत्रकांन्वये QIS प्रणालीद्वारे ऑनलाईन पद्धतीने तारांकित प्रश्नांच्या उत्तरांच्या प्रती पाठविण्याबाबतच्या तसेच सदर प्रश्न त्याच प्रणालीद्वारे ऑनलाईन पद्धतीने इतर विभागांकडे हस्तांतरित करण्यासंदर्भातील सूचना दिल्या आहेत. सदर सूचनांची काटेकोरपणे अंमलबजावणी करण्यात यावी.** प्रश्नांची उत्तरे परिपूर्णपणे व **विहित मुदतीत** पाठविली गेली नाही, तर संबंधित उत्तरे प्रश्नोत्तरांच्या छापील यादीत समाविष्ट केली जात नाहीत आणि त्याबाबत सभागृहात सन्माननीय सदस्यांकडून तीव्र नापसंती व्यक्त केली जाते. तसेच, त्याअनुषंगाने यापूर्वी सन २०१० च्या पहिल्या अधिवेशनामध्ये संबंधित विभागांच्या सचिवांकडून खुलासा घेण्याबाबत निदेश देण्यात आले होते. यास्तव, सर्व मंत्रालयीन विभागांनी ही बाब गांभिर्याने घेऊन, त्यांच्यांशी संबंधित तारांकित प्रश्नांची उत्तरे **विहित मुदतीतच** विधानमंडळ सचिवालयाकडे पाठविण्याबाबत कृपया खबरदारी घ्यावी व त्याबाबतची माहिती संबंधित विहीत मुदतीचा कालावधी संपल्याच्या दुसऱ्या दिवशी, सोबतच्या **विवरणपत्र-१ मध्ये** या विभागाकडे पाठवावी.

(२) विधानसभा व विधानपरिषद तारांकित स्वीकृत प्रश्नांची उत्तरे नकारार्थी असतील, तर त्याची माहिती आणि खुलाशासाठी पाठविलेल्या सूचना प्रश्नांची वस्तुस्थिती शासन परिपत्रक क्रमांक संसदीय कार्य विभाग क्रमांक मविस - १००५ / ११० / प्र.क्र.२९ / पाच, दिनांक ९ फेब्रुवारी २००५ रोजीच्या परिपत्रकामधील निदेशांनुसार, कृपया तीन दिवसांच्या आत विधानमंडळ सचिवालयास निश्चितपणे पाठवावी.

संदर्भाधिन अनुक्रमांक ४ व ५ येथील महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालयाच्या परिपत्रकांमध्ये नमूद केल्यानुसार तारांकीत प्रश्न अन्य विभागाकडे ऑनलाईन हस्तांतरित करण्यासंदर्भातील कार्यपद्धतीचे अनुपालन करण्याची दक्षता घेण्यात यावी.

२. तारांकित प्रश्न व इतर बाबी यांचे हस्तांतरण:-

जेव्हा कोणताही तारांकित प्रश्न, लक्षवेधी सूचना, ठराव किंवा प्रस्तावाचा विषय तो ज्या विभागाकडे प्राप्त झाला आहे आणि तो त्या विभागाशी संबंधित नसेल, तेव्हा त्याविभागांनी तो प्रश्न, लक्षवेधी सूचना, ठराव किंवा प्रस्ताव तो ज्या **विभागाशी संबंधित असेल त्या विभागाकडे कृपया तात्काळ व विभागांच्या सचिव स्तरावरच हस्तांतरित करावा.** यासंदर्भात सामान्य प्रशासन विभागाच्या परिपत्रक क्रमांक शाकाप-१०९१/८/१८(र.व का.), दिनांक ११ जुलै १९९१ अन्वये दिलेल्या सूचनांचे तसेच मा.मुख्य सचिवांच्या स्तरावरुन अर्धशासकीय पत्र क्रमांक शाकाप-२०१३/प्र.क्र.२/१८(र.व का.), दिनांक १४ जानेवारी २०१३ अन्वये दिलेल्या निदेशांचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

३. लक्षवेधी सूचनेवरील, तसेच, नियम ९३ व ९७ अन्वये करावयाची निवेदने :-

(१) उपरोक्त संदर्भाधीन **अनुक्रमांक १ व २** येथे नमूद करण्यात आलेल्या या विभागाच्या अनुक्रमे शासन निर्णयातील आणि शासन पत्रातील सूचनांनुसार, स्वीकृत लक्षवेधी सूचनांवरील निवेदने, महाराष्ट्र विधानसभा नियमावलीतील नियम ९७ अन्वये दिलेल्या स्थगन प्रस्तावाच्या सूचनांवरील निवेदने आणि महाराष्ट्र विधानपरिषद नियमावलीतील नियम ९३ अन्वये सदस्यांनी दिलेल्या सूचनांवरील निवेदने, यासंदर्भात आवश्यकती कार्यवाही, सर्व विभागांनी **कृपया विहित मुदतीतच पूर्ण करावी.** जेणेकरून अधिवेशन समाप्तीनंतर अशी निवेदने प्रलंबित राहणार नाहीत.

लक्षवेधी सूचना आदल्याच दिवशी प्राप्त झाल्यामुळे व त्याचे निवेदन तयार होऊ न शकल्यामुळे, संबंधित लक्षवेधी सूचना अन्य दिवशी चर्चेला घ्यावी, अशी विनंती काही वेळेस संबंधित खात्याच्या मा.मंत्री अथवा राज्यमंत्री महोदयांकडून केली जाते. तथापि, यापुढे अशी विनंती मान्य केली जाणार नाही, असे निदेश सन २०११ च्या अर्थसंकल्पीय अधिवेशनात मा.अध्यक्ष महोदयांनी दिले आहेत. त्याअनुषंगाने मा. मंत्री, संसदीय कार्य यांनी सर्व मा. मंत्री / राज्यमंत्री यांना पाठविलेले पत्र क्रमांक विमंअ- २०११ / (१) / पाच, दिनांक १५ मार्च २०११ अन्वये कळविल्यानुसार, वरीलप्रमाणे परिस्थिती असली तरीही अशी निवेदने **विहित वेळेतच** विधानमंडळ सचिवालयास पाठविण्याची दक्षता घ्यावी.

ज्या स्वीकृत लक्षवेधी सूचना **सभागृहात चर्चेला आलेल्या नाहीत,** त्या सूचनांवरील निवेदने अधिवेशन संस्थगित होण्यापूर्वी सभागृहाच्या पटलावर ठेवण्याची प्रक्रिया पार पाडण्यासाठी, विधानमंडळ सचिवालयाकडे **अधिवेशन संपण्यापूर्वी एक दिवस अगोदर** निश्चितपणे पाठवावीत; आणि त्याबाबतची माहिती **सोबतच्या विवरणपत्र-२ मध्ये** याविभागास अधिवेशन संपल्यानंतर **कृपया एक आठवड्याच्या आत** पाठवावी.लक्षवेधी सूचनासंबंधी ही वस्तुस्थिती लक्षात घेता कोणतीही लक्षवेधी सूचना प्रलंबित राहणार नाही याची दक्षता सर्व विभागांनी घ्यावी.

४. **वार्षिक अहवाल** :-शासन परिपत्रक, संसदीय कार्य विभाग, क्रमांक विमंअ-२००८ / प्र.क्र.५९ / पाच, दिनांक १५ सप्टेंबर २००८ अन्वये दिलेल्यासूचनांनुसार, शासनाचे अंगीकृत व्यवसाय, मंडळे, महामंडळे, स्वायत्त संस्था इत्यादींचे **वार्षिक अहवाल** विहित कार्यपद्धती अनुसरुन व विहित मुदतीतच विधानमंडळाला सादर करण्याची दक्षता घेण्यात यावी. प्रस्तुत बाबीसंदर्भात **"सभागृहाच्या पटलावर कागदपत्रे ठेवण्याबाबत"** च्या विधानसभेच्या **तदर्थ समितीच्या बैठकींमध्ये** गांभीर्याने दखल घेतली जात असल्यामुळे, सर्व सबंधित विभागांनी त्यांच्याशी संबंधित मंडळे, महामंडळे, उपक्रम, स्वायत्त संस्था इत्यादींचे वार्षिक अहवाल सभागृहाच्या पटलावर ठेवण्याबाबत उचित कार्यवाही **प्राधान्याने** करावी आणि त्यासंबंधी विलंब झाला

असल्यास, त्याची कारणे विधानमंडळ सचिवालयास कळविण्याबाबत शासन परिपत्रक संसदीय कार्य विभाग क्रमांक विमंअ-२०१५ / प्र. क्र. ११९ / पाच, दिनांक २३ सप्टेंबर २०१५ व वित्त विभाग, शासन निर्णय क्रमांक शासाउ-१०१५/प्र.क्र.४८/सा.उ.,दिनांक २० ऑक्टोबर,२०१५ अन्वये दिलेल्या निदेशांचे कृपया अनुपालन करावे.

५. **शासकीय विधेयके** :-विधानमंडळाच्या दोन्ही सभागृहांमध्ये **शासकीय विधेयकांवर चर्चा होऊन ती संमत होणे, ही बाब अत्यंत महत्त्वाची** असून, त्यासंदर्भात प्रस्तुत विधेयकांवरील चर्चेमध्ये सन्माननीय सदस्यांनी उपस्थित केलेल्या मुद्यांना मा.मंत्री/राज्यमंत्री महोदयांनी समाधानकारक उत्तरे देणे अपेक्षित असते. यास्तव, सदर विधेयकांमध्ये समाविष्ट असलेल्या सुधारणे संबंधात संपूर्ण माहिती असलेली स्वयंस्पष्ट टिप्पणी संबंधित विभागाच्या सचिवांनी संबंधित मा.मंत्री/राज्यमंत्री महोदयांना सभागृहातील चर्चेपूर्वी तयार करून द्यावी आणि त्याची प्रत मुख्यमंत्री सचिवालयास, तसेच संसदीय कार्य विभागास माहीतीसाठी पाठवावी.

६. **औचित्याचे मुद्दे, विशेष उल्लेख आणि कपात सूचना व अतारांकित प्रश्न** :- सभागृहात मा.सदस्यांकडून उपस्थित करण्यात येणारे औचित्याचे मुद्दे, कपात सूचना व विशेष उल्लेख यांची उत्तरे सदस्यांना **विहित मुदतीत** प्राप्त होत नाहीत व त्याबाबतदेखील त्यांच्याकडून वारंवार आक्षेप घेण्यात येतात. यास्तव, औचित्याचे मुद्दे, कपात सूचना व विशेष उल्लेख यांची उत्तरे मा.सदस्यांना **विहीत कालमर्यादेतच** पाठविण्यात यावीत. तसेच, अतारांकीत प्रश्नांची उत्तरे विहित मुदतीत विधानमंडळ सचिवालयाकडे पाठवावीत. त्याअनुषंगाने विधानसभेच्या **"सभागृहाच्या पटलावर कागदपत्रे ठेवण्याबाबत"** च्या तदर्थ समितीच्या बैठकीत गांभीर्याने दखल घेतली असल्यामुळे, प्रस्तुत बाबींसंदर्भातील कार्यवाही **प्राधान्याने व विहीत समयमर्यादेतच** करावी. तसेच विद्यमान अधिवेशनामध्ये प्राप्त झालेल्या प्रस्तुत बाबीची माहिती सोबतच्या विवरणपत्र - २ मध्ये अधिवेशनाच्या समाप्तीच्या घोषणेनंतर लगेचच संसदीय कार्य विभागास पाठवावी.कपात सूचना संदर्भातील माहिती वित्त विभागाकडून संकलीत केली जात असल्याने, कपात सूचनाबाबतची माहिती वित्त विभागाच्या **अर्थसंकल्प-३** शाखेस निश्चितपणे पाठविण्यात यावी व त्याची नोंद ई-समिक्षा प्रणालीवर बिनचूक घेण्यात येईल याची दक्षता घेण्यात यावी.

७. **अशासकीय कामकाज** :- संसदीय कार्य विभागाच्या संदर्भाधीन दि. २ डिसेंबर १९९८ च्या शासन निर्णयातील सूचना क्र. १५ अन्वये अशासकीय विधेयके / ठरावासंदर्भात कार्यपद्धती विषद करण्यात आली आहे. सदर कार्यपद्धतीमध्ये नमूद केलेल्या सूचनांनुसार कार्यवाही होईल याची दक्षता सर्व विभागांनी घ्यावी. या संदर्भात नमूद करण्यात येते की, जे अशासकीय कामकाज (विधेयके/ठराव) नियोजित दिवशी न होता ते कामकाज त्याच अधिवेशनात अन्य दिवशी दर्शविण्यात आल्यास आणि ज्या विधेयक / ठरावासंदर्भात मंत्रिमंडळाचा निर्णय घेण्यात आला असेल अशा विधेयक / ठरावाच्या मूळ प्रस्तावामध्ये तथ्य आणि तपशिलामध्ये कोणताही बदल झालेला नसल्यास आणि मंत्रिमंडळासमोर पूर्वी नेण्यात आलेल्या प्रस्ताव व तपशीलात कोणताही बदल करणे आवश्यक नसल्यास, अशा विधेयक / ठरावासंदर्भातील प्रस्ताव पुनश्च: मंत्रिमंडळाच्या मान्यतेसाठी सादर करण्याची आवश्यकता राहणार नाही.

८. **सभागृहातील मुद्दे/आश्वासने/निदेश यांची नोंद** :- विधानसभा आणि विधानपरिषद या दोन्ही सभागृहांच्या कामकाजामध्ये सन्माननीय सदस्यांद्वारे कोणत्याही विभागाचा **मुद्दा** केव्हाही उपस्थित होऊ शकतो आणि त्याअनुषंगाने मा.पीठासीन अधिकाऱ्यांकडून कार्यवाहीसाठी निदेश दिले जातात. यास्तव, सदर निदेशानुसार **शिघ्रतेने** कार्यवाही करण्यासाठी सर्व विभागांना अशा सूचना देण्यात येत आहेत की, त्यांनी

विधानसभा आणि विधानपरिषद या दोन्हीसभागृहांच्या गॅलरीमध्ये त्यांच्या विभागाचे जे अधिकारी रोज उपस्थित राहतील, त्यांना सदरहू **मुद्दे,** त्यासंदर्भात मा.पीठासीन अधिकाऱ्यांनी दिलेले **निदेश,**तसेच, मा.मंत्री महोदयांनी सभागृहात दिलेली **आश्वासने** यांची नोंद घेण्याबाबत व त्यासंबंधीची माहिती त्यांच्या विभागाच्या संबंधित कार्यासनांच्या अधिकाऱ्यांना **त्याच दिवशी** कळविण्याबाबत निदेश द्यावेत, जेणेकरुन संबंधितांना पुढील कार्यवाही विनाविलंब करता येईल.

९. उपरोक्त सूचनांनुसार सर्वमंत्रालयीन विभागांनी विधानमंडळ कामकाजाकडे **कृपया गांभिर्याने आणि सर्वप्राथम्याने** लक्ष द्यावे व सन्माननीय सदस्यांकडून विविध आयुधांद्वारे उपस्थित करण्यात आलेल्या बाबींची उत्तरे सुसंगत, परिपूर्ण आणि सर्वसमावेशक असतील, तसेच सदर उत्तरे विहित मुदतीतच विधानमंडळ सचिवालयास / संबंधीत सन्माननीय सदस्यांना पाठविली जातील, याची सर्व अधिकाऱ्यांनी कृपया दक्षता घ्यावी.

प्रस्तुत शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२००८१९१७०९४९४८१५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra G Bhagwat

Digitally signed by Rajendra G Bhagwat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Parliamentary Affairs Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=cc7aabd81415b8f5527e47fcdf6cb267b325f7490f2a874918347994ab7f727a, serialNumber=d818186dee70df53c608510c8f5de9e22be5a193d4a6472ca4de45a568dc44a7, cn=Rajendra G Bhagwat
Date: 2020.08.19 17:20:16 +05'30'

**( राजेन्द्र ग. भागवत )**
**सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. सर्व अपर मुख्य सचिव /प्रधानसचिव/सचिव, मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई
२. मा.मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई
३. सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, (अ, ब, ई-१ व ई-२ शाखा) विधानभवन, मुंबई.
४. उप सचिव, मुख्य सचिवांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
५. सर्वमंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
६. उप सचिव, सर्व मंत्रालयीन विभाग, ( विधानमंडळ कामकाज समन्वय शाखा )मंत्रालय, मुंबई
७. सर्व कक्ष अधिकारी, संसदीय कार्य विभाग, मंत्रालय,मुंबई
८.निवडनस्ती.

**शासन परिपत्रक सं. का. वि. क्रमांक - विमंअ - ०२२० / (३) / प्र. क्र.८० / पाच**

**दि. १९ ऑगस्ट, २०२० सोबतचे विवरणपत्र**

**विभाग**

**विवरणपत्र - १-**

| | विभागाकडे प्राप्त झालेल्या स्वीकृत तारांकीत प्रश्नांची संख्या | विहित मुदतीत प्रश्नोत्तराच्या प्रती QIS प्रणालीद्वारे विधानमंडळ सचिवालयाकडे **पाठविलेल्या** तारांकित प्रश्नांची संख्या | विहित मुदतीत प्रश्नोत्तराच्या प्रती QIS प्रणालीद्वारे विधानमंडळ सचिवालयाकडे **न पाठविलेल्या** तारांकित प्रश्नांची संख्या | विलंबाची कारणे |
|---|---|---|---|---|
| | १ | २ | ३ | ४ |
| विधानसभा | | | | |
| विधानपरिषद | | | | |
| **एकूण** | | | | |

**टीप :-**तारांकित प्रश्नांची उत्तरे पाठविण्याचा विहित दिनांक संपल्यानंतर, दुसऱ्या दिवशी प्रस्तुत माहिती या विभागास पाठवावी.

**विभाग**

**विवरणपत्र - २**

| अ. क्र. | विविध संसदीय आयुधांमार्फत उपस्थित बाबी | विभागाकडे प्राप्त झालेल्या स्वीकृत सूचनांची / मुद्यांची संख्या | विहित मुदतीत विधान मंडळ सचिवालयाकडे **पाठविलेल्या** निवेदनांची संख्या/ मा.सदस्यांना उत्तरे पाठविलेल्या मुद्दयांची सूचनांची संख्या | विहित मुदतीत विधानमंडळ सचिवालयाकडे **न पाठविलेल्या** निवेदनांची संख्या / मा. सदस्यांना अद्दयापि उत्तरे न पाठविलेल्या मुद्दयांची सूचनांची संख्या | विलंबाची कारणे |
|---|---|---|---|---|---|
| | | १ | २ | ३ | ४ |
| १ | लक्षवेधी सूचना | | | | |
| २ | ९३ अन्वये सूचना | | | | |
| ३ | ९७ अन्वये सूचना | | | | |
| ४ | औचित्याचे मुद्दे | | | | |
| ५ | विशेष उल्लेखाच्या सूचना | | | | |
| | **एकूण** | | | | |